सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील सोलापूर महानगरपालिकेच्या ताब्यातील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर बांधण्यासाठी वर्ष २०२०-२१ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सोऊघ २०१४/प्र.क्र.६० (भाग-१)/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०८.०७.२०२०

**वाचा-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक सोऊघ २०१४/प्र.क्र.६०/का.४, दि.०२.०५.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ, दि.१६ एप्रिल,२०२०.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५ /अर्थ-३, दि.४ मे, २०२०.
४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव,जिल्हा नियोजन समिती सोलापूर यांचे पत्र क्रमांकः नि-१९/ जा.क्र.उर्दूघर/२०१९-२० /संस-२/७५० /२०१९, दि.१९.०३.२०२०.

**प्रस्तावना-**

सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील सोलापूर महानगरपालिकेच्या ताब्यातील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर बांधण्यात आलेल्या उर्दू घराच्या बांधकामासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

उर्दू घर या प्रयोजनासाठी वर्ष २०२०-२१ मध्ये रु.७.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली आहे. सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील सोलापूर महानगरपालिकेच्या ताब्यातील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.८,९७,१९,०००/- (रुपये आठ कोटी सत्याण्णव लाख एकोणीस हजार मात्र) इतक्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सोलापूर यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये सोलापूर उर्दू घरासाठी अनुदान वितरित करण्याची मागणी सादर केली आहे. त्यास अनुसरुन उर्दू घरासाठी वरील संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन परिपत्रकातील मान्यतेस आणि नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनसरुन, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर यांना रु.११,२६,०००/- (रुपये अकरा लाख सव्वीस हजार मात्र) इतके अनुदान वितरित करण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर यांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु.११,२६,०००/- (रुपये अकरा लाख सव्वीस हजार मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण करुन कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांना संवितरण करण्यास

या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी शासनास सादर करावे..

सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००-इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन विभाग आणि वित्त विभाग अनौ.संदर्भ क्रमांकः ९६/२०२/व्यय -१, दि.२४.०६.२०२० अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०८१५२०१२२७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, serialNumber=b88babb31cb2c1163b5a1e41e86d809272fea914814734600d0b42642848c06f, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2020.07.08 15:27:40 +05'30'

**( तुषार दि. राठोड )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ ( लेखापरिक्षा / लेखावअनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. आयुक्त, पुणे महसूल विभाग, पुणे,
३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी, सोलापूर,
४. आयुक्त,सोलापूर महानगरपालिका, सोलापूर,
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर, जि.सोलापूर,
६. जिल्हाअकोषागार अधिकारी, सोलापूर,
७. स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, उपसचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. वित्त विभाग / नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.